वनवृत्तांकरिता पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांची नियुक्ती करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.आयएफएस-२०१७/प्र.क्र.१०८/फ-७**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक- २२ ऑगस्ट, २०१७**

**संदर्भ:-** १) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-आयएफएस- २०१२/ १३५/ प्र.क्र.३४/ फ-७, दिनांक १४ जुलै, २०१५.
२) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-एएफओ-१०१३/प्र.क्र.२४१/फ-७, दिनांक २८ एप्रिल, २०१७.
३) कार्मिक, लोक शिकायत तथा पेंशन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली यांची क्र.सा.का.नि. ७९२ (अ), दिनांक १२/०८/२०१६ ची अधिसूचना.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर यांचे क्र.भावसे/आसयमेंट/प्र.क्र.१२४/ ८९-९०/भाग-७/कक्ष-९/४२०/१७-१८, दिनांक-१२/०५/२०१५ चे पत्र.

## परिपत्रक:-

राज्यात वन विभागांतर्गत सद्य:स्थितीत ११ प्रादेशिक वनवृत्त आहेत. प्रादेशिक वनवृत्तांच्या प्रशासनावर संनियंत्रण ठेवण्यासाठी तसेच प्रशासनात गतिमानता आणण्यासाठी प्रत्येक प्रादेशिक वनवृत्तासाठी संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये एक पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक नियुक्त करण्यात आले आहेत. लोकाभिमुख व गतिमान प्रशासन हा शासनाचा उद्देश सफल होण्याच्या दृष्टीने पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांची भूमिका महत्वपूर्ण आहे. प्रशासनात पूर्णपणे पारदर्शकता व गतिमानता यावी या दृष्टीकोनातून शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक १४ जुलै, २०१५ च्या शासन परिपत्रकान्वये पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांच्या नियुक्तीबाबत व त्यांनी करावयाच्या प्रशासकीय कामकाजाबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. संदर्भाधीन क्र.२ येथील महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-एएफओ-१०१३/प्र.क्र.२४१/फ-७, दिनांक २८/०४/२०१७ च्या अधिसूचनेन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) या पदाची प्रधान मुख्य वनसंरक्षक श्रेणीत (दि.३०/०९/२०१७ पर्यंत) श्रेणीवाढ करण्यात आले आहे. तसेच केंद्र शासनाच्या कार्मिक, लोक शिकायत तथा पेंशन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभाग क्र.सा.का.नि. ७९२ (अ), दिनांक १२/०८/२०१६ च्या अधिसूचनेन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संसाधन उपयोग) हे पद मुख्य वनसंरक्षक श्रेणीत अवनत करण्यात आले आहे. त्यास अनुसरून संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. २ मधील प्रादेशिक वनवृत्त निहाय पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांच्या नियुक्तीबाबत खालील प्रमाणे बदल करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | वनवृत्त | सद्य पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक | सुधारित पालक अपर प्रधान मुख्य वनंसक्षक |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) |
| २ | धुळे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ठ वनोपज) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कॅम्पा) |
| ३ | पुणे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (केंद्रस्थ अधिकारी) |
| ४ | औरंगाबाद | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान व प्रसिध्दी) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ठ वनोपज) |
| ५ | अमरावती | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान व प्रसिध्दी) |
| ६ | यवतमाळ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संसाधन उपयोग) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग) |
| ७ | नागपूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (केंद्रस्थ अधिकारी) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) |
| ८ | कोल्हापूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कॅम्पा) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय) सामाजिक वनीकरण, पुणे |
| ९ | ठाणे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) |
| १० | चंद्रपूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) |
| ११ | गडचिरोली | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (योजना व्यवस्थापन-वन्यजीव) |

२. सर्व पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक हे त्यांच्याशी संबंधित वनवृत्ताकरिता संदर्भाधीन क्र.१ येथील महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-आयएफएस-२०१२/१३५/प्र.क्र.३४/फ-७, दिनांक १४ जुलै, २०१५ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक २ ब येथे नमूद केलेले कामकाज पार पाडतील.

३. सदरचे परिपत्रक दिनांक ०१.१०.२०१७ पासून लागू करण्यात येत असून, संबंधित पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक त्यांच्याकडे सोपविण्यात आलेल्या वनवृत्तातील सर्व अधिकाऱ्यांचे सन २०१७-१८ चे कार्यमुल्यांकन अहवाल/गोपनीय अहवाल प्रतिवेदीत व पुनर्विलोकीत करण्याचे काम पार पाडतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०८२२१३४५५२१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.08.22 13:35:37 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत:-**

१. मा.विरोधी पक्ष नेता, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य.
३. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे अपर प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. व्यवस्थापकीय संचालक, वन विकास महामंडळ, नागपूर.
११. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१५. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक
१६. सर्व मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक/उप वनसंरक्षक/विभागीय वन अधिकारी व सहायक वनसरंक्षक पदावर कार्यरत असलेले भारतीय वन सेवेतील अधिकारी.
१७. सर्व महाव्यवस्थापक/विभागीय व्यवस्थापक, वनविकास महामंडळ मर्या.
१८. सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१९. सहसचिव/उपसचिव/विशेष कार्य अधिकारी (फ-१), महसूल व वन विभाग (वन कक्षातील)
२०. निवडनस्ती, कार्यासन फ-७